**भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील सहसंचालक (गट-अ) या संवर्गातील पदोन्नती देणेबाबत...**
**श्रीम.अंजली सतिश नगरकर**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन निर्णय क्र.एमएनए-०८२१/प्र.क्र.७२/उद्योग-९,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगूरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- १५ मार्च २०२४

**वाचा :** १. सामान्य प्रशासन शा.नि. क्र. एसआरव्ही-२०८/प्र.क्र.१५९/कार्या.१२, दि.१.०८.२०१९
२. भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांचे पत्र क्र.गोप-१९/ससं/पदोन्नती/२०२२/४२३, दि.०४.०१.२०२२

**शासन निर्णय :-**

भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या आस्थापनेवरील उपसंचालक (गट-अ) (एस-२३ : ६६७००-२०८७००) या पदावरुन सहसंचालक (गट-अ) (वेतनश्रेणी एस-२६ : ८२२००-२११५००) या पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात श्रीम.अंजली सतिश नगरकर यांना पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ३ येथे दर्शविलेल्या ठिकाणी करण्यास, खालील परिच्छेद क्र.२ येथे नमूद अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**पदोन्नतीनंतरची पदस्थापना :-**

| अ. क्र | अधिकाऱ्यांचे नाव | प्रवर्ग | पदोन्नतीनंतर पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | | ३ | ४ |
| १ | श्रीम. अंजली सतिश नगरकर | एस.सी. | सहसंचालक (गट-अ), प्रमुख कार्यालय, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर | रिक्त पदी |

२. उपरोक्त तक्त्यात नमूद केलेप्रमाणे श्रीम.नगरकर यांची पदोन्नती ही खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून करण्यात येत आहे.

१) सदर पदोन्नती ही मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ मधील निर्णयाच्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोटयातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाज्येष्ठतेनुसार भरण्याबाबत व सामान्य प्रशासन विभाग १६-ब कार्यासनाच्या दि.७.०५.२०२१ रोजीच्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनानुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहे.

२) सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरूपाची असल्याने, निवडसूचीतील अधिकाऱ्यांना नियमितपणाचा कोणताही हक्क मिळणार नाही.

३) सदर पदोन्नती महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४) श्रीम.नगरकर यांनी सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्र. वशिअ-१२१४/प्र.क्र.२६/११, दि.२.०६.२०१४ नुसार पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्यापूर्वी अद्ययावत मत्ता व दायित्वाचे विवरणपत्र महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांना सादर करणे अनिवार्य राहील.

५) सहसंचालक (गट-अ) या पदावर पदोन्नत झालेल्या श्रीम.नगरकर यांना सदर आदेशान्वये एकतर्फी कार्यमुक्त करण्यात येत आहे. तसेच त्यांनी त्यांचेकडील असलेला कार्यभार महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांच्या निर्देशानुसार अन्य अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे. पदोन्नतीच्या पदावर कमाल ३० दिवसात रुजू व्हावे व रूजू अहवाल शासनास सादर करावा.

६) श्रीम.नगरकर ज्या दिनांकास पदोन्नतीच्या पदावर रुजू होतील त्या दिनांकापासून त्यांना पदोन्नती विषयक लाभ अनुज्ञेय होतील.

७) महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर यांनी श्रीम.नगरकर पदोन्नतीच्या पदावर रुजू होण्याच्या दृष्टीने आवश्यक ती कार्यवाही करावी व त्याबाबतचा कार्यपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३१५१७०२४५४८१० असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LAXMIKANT GOPALRAO DHOKE

Digitally signed by LAXMIKANT GOPALRAO DHOKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT,
2.5.4.20=413beeca50b65438c7a037917ccf1f24d8ca684b65640df6372ea731ffac4dfc, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=E714BBCD4D43C6782884C7E7A2091F9F1EDC1D97EBB542C48B98FB8C8BDD6CF4, cn=LAXMIKANT GOPALRAO DHOKE
Date: 2024.03.15 17:12:07 +05'30'

**(लक्ष्मीकांत ढोके)**
**शासनाचे सहसचिव**

**प्रत,**

- मा.मुख्यमंत्री यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
- अपर मुख्य सचिव (खनिकर्म) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
- महासंचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
- उप सचिव, सामान्य प्रशासन विभाग (१२/१६ब ), मंत्रालय, मुंबई.
- उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, नागपूर/चंद्रपूर/कोल्हापूर/ औरंगाबाद
- महालेखापाल, महाराष्ट्र-१/२(लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), मुंबई /नागपूर.
- अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
- श्रीम.अंजली सतिश नगरकर, उपसंचालक, प्रादेशिक कार्यालय, कोल्हापूर
- निवड नस्ती (उद्योग-९).